**महाराष्ट्र कोस्टल झोन मॅनेजमेंट अथॉरिटीस सहाय्यक अनुदान मंजूर व वितरित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एमसीझेडएमए २०२४/प्र.क्र.५/तां क-४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २०२४

<u>वाचा-</u>

१) शासन निर्णय क्रमांक वायोजना २००२/प्र.क्र.३३/तां. क. ३, दि. १६ मे, २००९.
२) शासन निर्णय क्रमांक इएनव्ही-२००२/प्र.क्र.७२ /तां क. ३, दि १२ मे, २००९,
३) शासन निर्णय क्रमांक बजेट २००९/प्र.क्र.८७/ तां.क. ३, दि. २२ मे, २००९.
४) शासन निर्णय क्रमांक एमसीझेडएमए २०१३ (१)/प्र.क. १५/ तां. क. २, दि. ३० मार्च २०१३
५) शासन निर्णय क्रमांक: एमसीझेडएमए २०१४/प्र.क्र.१९/ तां. क.-४, दि. ३० मार्च, २०१४
६) शासन निर्णय क्रमांक एमसीझेडएमए २०१४/प्र.क्र. १८२/ तां. क. ४, दि. ३१ ऑगस्ट, २०१५
७) शासन निर्णय क्रमांक एमसीझेडएमए २०१५/प्र.क्र. ३०७/ तां. क. ४, दि. २३ नोव्हेंबर २०१५
८) शासन निर्णय क्र. अर्थस २०१७/ प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७
९) शासन परिपत्रक क्र. अर्थस २०१७/ प्र.क्र. १४/अर्थ-३, दिनांक ३० जून, २०१७
१०) शासन निर्णय क्र. एमसीझेडएमए २०१७/प्र.क्र. १५८/ तां. क.-४, दिनांक १८ जानेवारी २०१८

<u>प्रस्तावना</u>

केंद्र शासनाच्या पर्यावरण व वने मंत्रालयाने पर्यावरण संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्याच्या तटीय क्षेत्राचे पर्यावरणदृष्ट्या संरक्षण व संवर्धन करण्यासाठी महाराष्ट्र सागरी किनारी व्यवस्थापन प्राधिकरणाची (MCZMA) स्थापना केलेली आहे. राज्याच्या तटीय क्षेत्रातील पर्यावरणदृष्ट्या संवेदनशील क्षेत्र निश्चित करून त्याचे सागरी क्षेत्र व्यवस्थापन आराखडे (CZMP) तयार करणे व एकूण तटीय क्षेत्राच्या पर्यावरणीय व्यवस्थापनाच्या समन्वयाचे काम महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरणा (MCZMA) मार्फत करण्यात येते. महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरणास (MCZMA) सहायक अनुदान मंजूर करून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय**

महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरणास (MCZMA) सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात रक्कम रु.३.५० कोटी मंजूर करून वितरीत करण्यात यावा.

(१) " महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरणास (MCZMA) सहाय्यक अनुदाने या कार्यक्रमा अंतर्गत संदर्भाधीन दिनांक १२ ऑगस्ट २००९ मध्ये नमूद केलेला कार्यक्रम राबविण्यासाठी सन २०२३-२४ या वर्षाकरीता योजनांतर्गत एकूण रुपये ५ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यापैकी रू. ३ कोटी ५० लक्ष इतका निधी बीम्स प्रणालीद्वारे वितरित करण्यात आला आहे.

(२) उपरोक्त निधी हा महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरणाच्या (MCZMA) स्टेट बँक ऑफ इंडियामध्ये उघडण्यात आलेल्या खात्यामध्ये जमा करण्यात यावा.

(३) सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्या योजनांतर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा केलेली वा मान्य केलेली रक्कम शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्ती प्रमाणे व विहित कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे. हा निधी इतर दुस-या कामासाठी वापरता येणार नाही किंवा वळता करता येणार नाही.

(४) महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरणाने (MCZMA) प्रत्येक आर्थिक वर्षाचे उपयोगिता प्रमाणपत्र वर्ष संपल्यानंतर एप्रिलच्या १५ तारखेपर्यंत पर्यावरण विभागास सादर करावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी बँकेतील या खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणाऱ्या पासबुकची साक्षांकित प्रत सोबत जोडण्यात यावी.

(५) सहाय्यक अनुदानामधून करण्यात येणाऱ्या खर्चाच्या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावेत व त्याचे लेखापरिक्षण करण्यात यावे व त्यांचा अहवाल पर्यावरण विभागास पाठविण्यात यावा.

(६) राज्य शासनाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटींचे व शर्तीचे पालन करणे महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरणावर (MCZMA) बंधनकारक राहील.

(७) सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्या मार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरणास (MCZMA) अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी श्री. किशोर सोईतकर, कक्ष अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. सु.कि.निकम, सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांना घोषित करण्यात आले आहे. त्यांनी महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरण (MCZMA) यांच्या नावे रु. ३ कोटी ५० लक्ष एवढया निधीचा धनादेश काढावा.

(८) सदर खर्च मागणी क्रमांक यू-४, ३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना (०२) (१२) महाराष्ट्र किनारी क्षेत्र व्यवस्थापन प्राधिकरण (३४३५ १२९४), ३१ सहाय्यक अनुदाने या मुख्य लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व हा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, दिनांक १२ एप्रिल, २०२३ रोजीच्या शासन निर्णयातील परिशिष्टातील अनु.क्र. २ व ९ मधील अटींची पुर्तता होत आहे, तसेच वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्रक्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ व दि.०५ फेब्रुवारी,२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार वितरित करण्यात येत आहे.

I) वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यास विभागाला अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

II) वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,३,४,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की ही योजना केंद्र पुरस्कृत बाहय सहाय्यित योजना नाही.

III) वित्त विभागाच्या परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक १,२,३ व ४ मध्ये नमूद

करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही

४. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्र. अनौस क्र.६०/२०२४/व्यय-१६, दि. २८.०२.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून वितरीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१३१४१७३७३८०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

MADANE VISHAL VISHWAS

Digitally signed by MADANE VISHAL VISHWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=bb0ed28a897fc87f69fe8807b3d9428966ce3233edb83a20c38834c19f2e3793, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CB16DB1CC002E115B709A8CA348A6483883493AAF53B7BE25836CDA1B57FF2DC, cn=MADANE VISHAL VISHWAS
Date: 2024.03.13 14:27:04 +05'30'

**(विशाल मदने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव,
२. अध्यक्ष, महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरण तथा अ.मु.स. पर्यावरण व वा.ब. विभाग, मंत्रालय, मुंबई..
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा से हकदारी / लेखा परिक्षा) महाराष्ट्र मुंबई/नागपुर
४. संचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मुंबई
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र सागरी किनारा व्यवस्थापन प्राधिकरण.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी मुंबई
८. वित्त विभाग, व्यय-१६ / अर्थसंकल्प ७, मंत्रालय, मुंबई,
९. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. निवड नस्ती, पर्यावरण व वा.ब. विभाग, मुंबई